


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४-८ फुटकळ अंकास १ ०.

ॐ भूयानसि महानसि

प्राथमिक व दुय्यम शाळांतील वाचनालयांकरितां मुंबई सरकारनें मंजूर केलेली

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेमार्फत प्रसिद्ध होणारी

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

सह वीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु ॥

वर्ष ४ थें, अंक २ रा

विजयादशमी १८५३ ऑक्टोबर १९३१

अनुक्रमणिका

उद्देशः—मराठी भाषा, वाङ्मय व साहित्य यांच्या अभिवृध्यर्थ प्रयत्न करणें, उपाय योजणें व इतर रीतीनें झटणें आणि त्यांच्या अभ्यासास प्रोत्साहन देणें.

# महाराष्ट्र साहित्य परिषद

अध्यक्षः—सरदार माधवरावसाहेब किबे.

उपाध्यक्षः— १ श्री. चिंतामणराव वैद्य २ श्री. नरसिंह चिंतामण केळकर ३ श्री. वामन मल्हार जोशी ४ श्रीमंत संपतराव गायकवाड ५ श्री. केशवराव कोरटकर.

कार्याध्यक्षः—श्री. ना. गो. चापेकर.

चिटणीसः—श्री. माधवराव त्रिंबक पटवर्धन, २ श्री. कृ. पां. कुलकर्णी.

कोशाध्यक्षः—श्री. सुंदरराव भास्कर वैद्य, मुंबई.

हिशेब-तपासनीसः— १ श्री. परुळकर मुंबई, २ श्री. ग. स. मराठे, पुणें.

कार्यकारी मंडळः— १ श्री. ना. गो. चापेकर, २ प्रो. मा. त्रिं. पटवर्धन, ३ श्री. कृ. पां कुलकर्णी, ४ श्री. चिं. ग. कर्वे, ५ श्री. शं. गो. घैसास.

## नियामक मंडळांतील सदस्यांचीं नांवें

प्रो. पां. वा. काणे, मुंबई
प्रो. द. वा. पोतदार, पुणें
श्री. सौ. कमलाबाईसाहेब किबे, इंदोर
रा. दा. सा. सावळाराम यंदे, मुंबई
प्रो. पेंडसे, नागपूर
प्रो. सांवर्डेकर, गोवें
प्रि. ज. रा. घारपुरे, मुंबई
रा. आपटे, बडोदें
श्री. यशवंतराव दाते, पुणें
रा. न. र. फाटक, मुंबई
प्रो. बनहट्टी, नागपूर
श्री. द. व्यं. पै, गोवें
प्रो. श्री. नी. चाफेकर, पुणें
रा. ना. म. भिडे, भोर
रा. आ. बा. लट्ठे, बेळगांव
रा. ब. ग. खापर्डे, उमरावती
श्री. वा. ना. देशपांडे, सातारा
श्री. बा. रा. रणसिंग, धुळें
श्री. रा. ब. महाजनी, अकोला
श्री. गं. गो. कानेटकर, जबलपूर
सौ. सुलोजनाबाई हुदलीकर, पुणें
डॉ. लेले, बडोदें
श्री. विनायक हरी आपटे, इंदोर
सरदार चंद्रोजीराव आंग्रे, ग्वाल्हेर
श्री. कृ. प्र. खाडिलकर, मुंबई
प्रो. पंगु, कोल्हापूर
रा. भा. रा. पटवर्धन, धारवाड
रा. प्र. धों. कानिटकर, भोर
रा. य. खु. देशपांडे, यवतमाळ
प्रो. आघारकर, कलकत्ता
प्रो. पाटणकर, नाशीक
श्री. वामनराव नाईक, हैद्राबाद
श्री. यादवराव काळे, बुलढाणा
श्री. जी. पी. पटवर्धन, (सोलापूर)
प्रो. ना. के. बेहेरे, नागपूर
प्रो. क्षीरसागर, हैद्राबाद
श्री. गो. ब. माकोडे, ग्वाल्हेर
प्रो. वा. गो. मायदेव, पुणें
डॉ. केतकर, पुणें
श्री. वि. द. घाटे, नगर
प्रो. मा. दा. अळतेकर, मुंबई

# अनुक्रमणिका







---


आर्यसंस्कृति-मुद्रणालय, चिमणबाग, टिळकरस्ता, पुणे येथे सीताराम वासुदेव फडणीस, बी.ए., यांनी छापिलें व मुंबई येथे महाराष्ट्र–साहित्य–परिषदेच्या कार्यालयांत (भाई जीवनजीची गल्ली, मुंबई नं. २) परिषदेकरितां रा. ना. गो. चापेकर यांनी प्रसिद्ध केलें.

# मराठी-भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास

## खंड पहिला-पूर्वार्ध

### प्रकरण पहिलें

### विषयप्रवेश

१. कोणत्याहि भाषेचा इतिहास म्हटला म्हणजे त्या भाषेची जन्मापासून वर्तमानकाला पर्यंतची इत्थंभूत हकीकत होय. या हकीकतींत त्या भाषेचें कूळ, जन्मकाळ, स्थित्यंतरें, रूपांतरें संकोचविकास, इत्यादि बाबींचा समावेश झाला पाहिजे, हें उघड आहे. अर्थात्च अशा तऱ्हेच्या कथानकाची सर्व मदार त्या भाषेंत निरनिराळ्या काळीं उत्पन्न झालेल्या ग्रंथसंग्रहावर असणार, कारण या ग्रंथसंग्रहांतच तिचें त्या त्या काळचें स्वरूप प्रतिबिंबित होऊन टिकलेलें असतें. भाषेंतील असा प्राचीन ग्रंथसंग्रह उपलब्ध नसेल, तर इतिहासलेखकाला कांहीच कामगिरी करितां येणें शक्य नाहीं. कोणत्याहि भाषेचें सद्यःकालीन स्वरूप हें अनेक शतकांच्या परंपरेचें, परिणतीचें व कमावणीचें फळ असतें. या क्रियेचे निरनिराळे टप्पे त्या भाषेंतील निरनिराळ्या काळच्या ग्रंथांतच दिसून येतात. भाषेचा तोंडी व्यवहार अमूर्त व क्षणिक असतो. वाळूवर ओतलेल्या पाण्याचा, अगर हवेंत मारलेल्या तरवारीच्या पट्ट्याचा, जसा मागे कांहीच मागमूस राहात नाही, तद्वत् भाषेच्या तोंडी व्यवहाराची स्थिति असते. परंतु निराकार भाषा लिपिरूपांत अवतरली, म्हणजे तिचें स्वरूप दृश्य व टिकाऊ बनतें. भाषेंतील अखिल ग्रंथसंग्रहाला 'वाङ्मय' असें म्हणतात, व ' सारस्वत ' हा त्याच शब्दाचा पर्याय आहे. मुखव्यवहाराची भाषा व वाङ्मयाची भाषा यांचें स्वरूप तंतोतंत एक असतें, असें नाही; किंबहुना त्यांत बराच भेद असतो. आपलीं मुलेंबाळें, गडीमाणसें, स्नेहीसोबती, इत्यादिकांबरोबरच्या आपल्या घरगुती व्यवहारांत बरीच चालढकल, शैथिल्य व अव्यवस्थितपणा दिसून येतो. परंतु, तेच आपण समाजांत, कचेरींत किंवा दरबारांत वागतांना विशेष टापटीप, भारदस्तपणा व शिष्टपणा दाखवितों. हाच भेद भाषेचा मुखव्यवहार व लेखव्यवहार यांत दृष्टोत्पत्तीस येतो. पहिल्यांतील ढिलाई दुसऱ्यांत कमी प्रमाणांत आढळते व दुसऱ्याची सफाई पहिल्यापेक्षा जास्त असते. प्रतिष्ठित वाङ्मयांत अधिष्ठित झालेल्या ग्रंथांत तर हा फरक विशेषच आढळतो. तेव्हा कोणत्याही काळच्या अभियुक्त वाङ्मयांत त्या काळच्या मुखव्यवहारांतील भाषेचें यथातथ स्वरूप सापडेल, अशी अपेक्षा करणें फोल आहे. तरी पण अभियुक्त वाङ्मयांत न मोडणारे असे कांही लेख उपलब्ध झाल्यास, त्यांत त्या त्या काळच्या सामान्य तोंडी व्यवहारांतील भाषेचें स्वरूप बऱ्याच अंशीं हुबेहूब वठलें असण्याचा संभव असतो. असे लेख म्हणजे शिलालेख, दानपत्रें, खासगी पत्रव्यवहार, हिशेबी लिखाण, इत्यादि होत. हे लेख बरेच वेळां जपून,

टिपून व चापूनचोपून लिहिलेले नसतात, आणि याच गोष्टींत त्यांचें वैशिष्ठ्य व महत्त्व आहे. भाषेचा इतिहास लिहिणारांस वाङ्मयाच्या बरोबरीने या अव्यवस्थित, फालतू, व गयाळ लिखाणाचा उपयोग भाषेच्या कित्येक अवस्थांतरांचा विचार करितांना पुष्कळ होतो. भाषेच्या वाङ्मयांतहि दोन पोटभेद करणें अवश्य आहे. पहिल्या पोटभेदांत शास्त्रीय ग्रंथ येतात. व्याकरण, गणित, ज्योतिष, रसायन, पदार्थविज्ञान, वैद्यक, इत्यादि शास्त्रीय विषय, आणि शिल्प, स्थापत्य, संगीत, इत्यादि कला, आणि नाना प्रकारचे उद्योगधंदे, यांवर जे ग्रंथ होतात, ते सर्वसामान्य जनांकरिता नसून, त्या त्या शास्त्रांशीं, कलांशीं, अगर धंद्यांशीं ज्यांचा निकट संबंध येतो, तेवढ्याच व्यक्तींकरिता असतात या ग्रंथांचें महत्त्व त्यांतील भाषासरणीपेक्षा उपयुक्त माहितीवरच अवलंबून असतें. या ग्रंथांच्या साह्याने राष्ट्राच्या बुद्धिमत्तेचा व कलाकौशल्याचा व्याप त्या त्या काळीं किती संकुचित अगर विस्तृत होता, याचा अंदाज बांधतां येईल, परंतु तत्कालीन भाषेच्या इतिहासाचा निर्वाह करण्यास हे ग्रंथ पुरेसे अगर लायकहि ठरणार नाहींत. वाङ्मयाच्या दुसऱ्या पोटभेदांत जे ग्रंथ येतात, त्यांवर अशा इतिहासाची मुख्यतः मदार असते. या ग्रंथसमूहाला 'विदग्ध वाङ्मय' किंवा 'ललित सारस्वत' हें नांव देण्यांत येतें. हें सारस्वत सर्व सामान्य जनतेकरिता असतें, व यांतील भाषेचें स्वरूप त्या त्या काळीं घटीव, शुद्ध व शिष्टमान्य असतें; आणि निरनिराळ्या काळांतील अशा वाङ्मयाच्या धाटणीवरूनच कोणत्याहि शिष्टभाषेच्या इतिहासांतील टप्पे खात्रीने ठरवितां येतात. अर्थातच भाषेच्या आयुष्यांतील ज्या काळचें अशा तऱ्हेचें सारस्वत उपलब्ध नसेल, त्या काळचा त्या भाषेचा इतिहास अज्ञातच राहणार. मागील पुढील काळच्या स्थितिगतींवरून त्या अज्ञात काळांतील भाषेच्या स्वरूपविषयी अनुमान बांधितां येईल, परंतु निभ्रांत सिद्धांत ठरविणें अशक्य कोटींतच गणलें पाहिजे.

२. 'भाषा' ही मानवकोटीची खास कमाई आहे. परंतु मनुष्याच्या या सांकेतिक वैखरी वाणीचें स्वरूप सर्व भूतलावर सारखें आढळत नाहीं; किंबहुना भाषाभेद स्थानभेद यांचें बहुशः साहचर्यच आढळांत येतें. भूप्रदेश अफाट आहे, व मनुष्यजाति निरनिराळ्या भागांत निरनिराळे लहानमोठे संघ करून राहिलेली आहे; इतकेंच नव्हे, तर या मुख्य संघांतहि अनेक पोटभेद व शाखोपशाखा अस्तित्वांत आलेल्या आहेत. प्रत्येक संघांतील, अगर पोटसंघांतील अगर शाखेंतील व्यक्तींचा परस्परांशीं हरतऱ्हेचा व्यवहार सामान्यतः नित्यच घडतो. परंतु एका संघाचा दुसऱ्या संघाशीं व्यवहार कारणविशेषानेच घडतो. यामुळे प्रत्येक संघाच्या भाषेचें स्वरूप सामान्यतः निरनिराळें बनलेलें आहे. निरनिराळ्या संघांचें परस्परांशी संघटन व संघर्षण झाल्याने आचार, विचार व चीजवस्तु यांची जशी देवघेव होते, तशीच भाषेच्या संबंधींहि शब्द, रीति, प्रयोग, संप्रदाय, यांची थोडीबहुत देणीघेणी होते; परंतु कोणत्याहि संघाचें विशिष्टत्व जोपर्यंत अशा संघर्षणाने समूळ नाहींसें होत नाहीं, तोपर्यंत त्याचें वैशिष्ट्यहि सर्वतः नष्ट होत नाहीं. विकृति म्हणजे नाश नव्हे, तर केवळ रूपान्तर होय.

३. संघासंघांच्या भाषांना त्या त्या संघाच्या नांवावरून, अगर संघाच्या वसतिस्थानाच्या नांवावरून ओळखण्याची सामान्य वहिवाट आहे. 'मराठी भाषा' म्हणजे 'मराठ-

देशाची किंवा मराठ्यांची भाषा;' 'आंग्ल भाषा' म्हणजे 'आंग्लदेशाची किंवा आंग्लांची भाषा'. या भाषानामकरणाला दोन मोठे ठळक अपवाद आहेत, आणि ते दोन्हीहि हिंदुस्थानांतीलच आहेत. 'संस्कृत' भाषा व 'प्राकृत' भाषा हे ते अपवाद होत. पैकी 'संस्कृत' ही एकच भाषा व या शब्दाचा अर्थ शिष्टांची भाषा असा होतो. 'प्राकृत भाषा' हा एक भाषासंघ असून, त्यांतील पोटभाषांना देशवाचक अगर लोकवाचक विशेषण लाविलें आहे; उदाहरणार्थ महाराष्ट्री प्राकृत, शौरसेनी प्राकृत, पैशाची प्राकृत, इ०. 'प्राकृत' भाषा म्हणजे 'संस्कृताच्या' तुलनेने अशिष्ट गणलेली सामान्य जनांची भाषा.

४ येथे 'संस्कृत' भाषेसंबंधी एका मुद्याचा विचार करणें अप्रस्तुत होणार नाही असें वाटतें. कित्येक विद्वानांच्या मतें 'संस्कृत' भाषा ही कधीच लोकव्यवहारांतील भाषा नव्हती. ती केवळ हिंदी पंडितांनी आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर कृत्रिमतेने उत्पन्न केली व तिला अफाट ग्रंथसंपत्तीने श्रीमंत बनविली ! हें मत खरें असतें, तर भारतवर्षीय आर्यपंडितांचा हा दोष न गणितां, हिमगिरीपासून कुमारीपर्यंत, व हिंदुस्थानच्या 'नंदनवनापासून' सुंदरबनापर्यंत सर्वांना ग्राह्य होईल अशी 'एस्पेरॅन्टो' तयार करण्याच्या कामीं पूर्ण यश संपादन करणाऱ्या भारतीय कल्पकतेच्या व दीर्घ प्रयत्नाच्या अजब जादुगिरीचें जितकें कौतुक करावें, तितकें थोडेंच झालें असतें. परंतु 'संस्कृत' भाषा अनेक शतकेंपर्यंत आर्यलोकांची प्रत्यक्ष वाग्व्यवहाराची भाषा होती, असें सिद्ध करण्याला भरपूर व भरभक्कम पुरावा आहे. निरुक्तकार यास्काचार्यांनी वेदभाषेच्या जोडीने तत्कालीन बोलीचा 'भाषा' या संज्ञेने उल्लेख करितात व या 'भाषेचें' त्यांनी जे विशेष नमूद केले आहेत ते लौकिक संस्कृतांत आढळतात[१]. पाणिनीनें आपल्या अष्टाध्यायींत ज्या वेदभाषेपासून भिन्न असणाऱ्या लौकिक बोलीचें व्याकरण लिहिलें आहे त्या बोलीला तो 'भाषा' हेंच नांव देतो. या आत्मकालीन 'भाषेच्या' व्याकरणांत पाणिनि स्पष्ट लिहितो की, "व्याकरणनियमांशीं विसंगत असे कांही प्रयोग शिष्टांच्या बोलींत कायम झाले असतील, तर त्यांचा अपवाददृष्टीने स्वीकार केलाच पाहिजे." यावरून सरळ फलित होतें की, पाणिनीच्या वेळी शिष्टेतर भाषा हयात होत्या व शिष्टभाषेंत कांही शिष्टेतर प्रयोग घुसून बद्धमूल झाल्यामुळे त्यांस पंक्तिपावन करून घेणें अवश्य होतें. इतकेंच नव्हे, तर प्रांतोंप्रांतीं निरनिराळ्या भाषाप्रचारांचें वेंगरुळी[२] मिसळण होऊन तें शिष्टत्व पावलें होतें; परंतु त्याचाहि संग्रह पाणिनीला आपल्या व्याकरणांत करणें वस्तुगत्यात्र अवश्य होतें. कारण कोणत्याहि व्यावहारिक भाषेचा उद्भव व्याकरणांतून होत नसतो; तर उलट व्याकरणाचाच संभव शिष्टांच्या बोलींतून होतो. संस्कृतांत नामधातूंच्या व्याकरणप्रक्रियेंत जी असंख्य वैकल्पिक रूपें आढळतात, त्यांचें बीज वरील गोष्टींतच असूं शकणार. संस्कृत व्याकरणांतील 'आदेशाचें' बंड, 'र, ड, ल' या व इतर कांही वर्णांचें सावर्ण्य, 'सेट्–अनिट्–वेट्', हें वर्गीकरण 'धातूंचें गणभेद', वाक्यांतील शब्दांच्या संधीच्या बाबतींत बोलणाऱ्याच्या मर्जीला[३] दिलेली

१ Dr. Sir R. G. Bhandarkar's 'Wilson Philological Lectures' pp. 287–289.

२ रा. वि. का. राजवाडेकृत 'संस्कृत भाषेचें स्वरूप.'

३ संहितैकपदे नित्या नित्या धातूपसर्गयोः । नित्या समासे वाक्ये तु सा विवक्षामपेक्षते ॥

सवड, आर्ष प्रयोगांचा ठेविलेला मान, इत्यादि सर्व प्रकार संस्कृत भाषा पाणिनीच्या वेळीं शिष्टजनांची प्रत्यक्ष बोलण्याची भाषा होती, हेंच दाखवितात. जर संस्कृत भाषा केवळ पंडितांच्या कल्पनेंतून अवतरलेली करणीची असती, तर त्यांनी तींत एकसूत्रीपणा आणिला असता व तो तसाच टिकला असता. पाणिनीच्या पूर्वींहि[1] अनेक व्याकरणकार होऊन गेले होते, व पाणिनीनें त्यांपैकीं कांहींचा आपल्या ग्रंथांत उल्लेखहि केला आहे. या पूर्वकालीन व्याकरणकारांत इंद्र, चंद्र, व महेश हीं नांवें आढळतात. आर्य भारतवर्षांत शिरण्यापूर्वी, 'बाल्हिक' अगर 'ब्राह्म' भाषा बोलत असत व ती बरीच स्वैर व अव्यवस्थित होती. तिची या व्याकरणत्रयाने नियन्त्रणा केली, असा उल्लेख आढळतो. पाणिनीनंतर सुद्धा अनेक व्याकरणकार झाले व कांहींनी 'वार्तिकें' व 'भाष्यें' या नांवाच्या पुस्त्या पाणिनीय व्याकरणास जोडिल्या आहेत. या सर्व व्याकरणकारांमध्ये लहानमोठे व थोडेफार भेद दृष्टोत्पत्तीस येतात. जर संस्कृतभाषा कपोलकल्पित व कृत्रिम असती, तर तींत अशा मतभेदास वावच मिळाला नसता व तिचें स्वरूप आरंभापासूनच अबाधित राहिलें असतें. पाणिनीच्या अष्टाध्यायीवरील पातंजल भाष्यांत 'शिष्ट कोण ?' हा प्रश्न उपस्थित करून, त्याचा असा निर्णय[2] लाविण्यांत आला आहे की, "ज्या वर्गाची भाषा सामान्यतः व्याकरणास आधार होते, व ज्या वर्गातील व्यक्ति व्याकरण न शिकतांहि व्याकरणनियमानुसार प्रयोग व रूपें योजितात व वर्णोच्चार करितात, त्याच वर्गाची शिष्टांत गणना होते. अतएव व्याकरण पढलेल्या इसमास शिष्ट लोकांची ओळख त्यांच्या वाणीवरून सहज पटते." एकंदरींत 'प्रयोगशरणा वैयाकरणाः' हें तत्त्व जर संस्कृत भाषेस लागू पडतें, व तें जर पाणिनीपासूनच्या सर्व व्याकरणकारांनी प्रांजलपणें कबूल केलें आहे, तर संस्कृत भाषेचें कृत्रिमत्व व कपोलकल्पितत्व कोठे राहिलें ?

५ संस्कृत भाषेसंबंधी दुसरा एक आक्षेप वारंवार ऐकण्यांत येतो की, संस्कृत ही 'मृत' भाषा आहे, तेव्हा तिच्या अध्ययनांत फारसा अर्थ नाही. तो केवळ काळाचा व श्रमाचा अपव्यय होय. परंतु आमच्या मतें संस्कृत भाषेला 'मृत' म्हणणें जरा जहालपणाचें लक्षण आहे. 'ग्रेट्ब्रिटन्' मधील 'जुने ब्रिटन्' लोक, प्राचीन 'इजिप्शन्' लोक, वैदिककालीन आर्यावर्तातील 'दास–दस्यू' हे मानवसंघ व त्यांच्या भाषा 'लुप्त' झाल्या. प्राचीन 'ग्रीक' व 'रोमन्' राष्ट्रें नष्ट झालीं व त्यांच्या भाषा 'मृतावस्थेस' गेल्या. परंतु भारतवर्षांतील आर्यराष्ट्र अद्याप 'लुप्त' अगर 'नष्ट' झालेलें नाहींत व त्यांची संस्कृत भाषाहि 'लुप्त' अगर 'मृत' झालेली नाही. ज्या भाषेचा संबंध राष्ट्रांतील शिष्ट वर्गाच्या व शिष्टेतर वर्गाच्याहि दैनंदिन सामाजिक, धार्मिक, राजकीय व वाङ्मयात्मक व्यवहाराशी हरघडी येतो, त्या भाषेला 'मृत' म्हणावयाचें तरी कसें ? संस्कृत भाषेचा अभ्यास जुने शास्त्रीपंडित व नवे शिक्षित आपापल्या परीने रीतसर करीत असतात. सार्वजनिक व खासगी रीतीने होणारीं

१ Muzumdar's Hindu History, p. 48. Dr. Belwalkar's Systems of Sanskrit Grammar pp. 9-11.

२ Dr. Sir R. G. Bhandarkar's "Wilson Philological Lectures" pp. 25–27, + 295–97.

प्रवचनें व पुराणें संस्कृतावरूनच होतात. कीर्तनकारांच्या कीर्तनांत संस्कृत वचनांना आद्यस्थान मिळतें व त्यांचें तत्त्वज्ञान, तर्कपद्धति व भाषासरणी हीं संस्कृत रंगानेच रंगलेलीं असतात. स्त्रियांच्या शिक्षणांतहि संस्कृताचा अवश्यमेव समावेश करण्यांत येतो. संस्कृत भाषेचा अधिक प्रचार पूर्वीप्रमाणे व्हावा म्हणून खास मंडळें स्थापन होत आहेत. वेदपाठशाला व संस्कृत-पाठशाळा ठिकठिकाणीं चालू आहेत. कोणताहि धार्मिक विधि या भाषेशिवाय सांग होऊं शकत नाही. संस्कृत भाषेंत निघणारीं वर्तमानपत्रें व मासिकेंहि आढळांत येतात. शिष्टांच्या भाषेंत शुद्ध संस्कृत शब्द व शिष्टेतरांच्या भाषेंत तेच संस्कृत शब्द थोड्याफार विकृत स्वरूपाने सुमारे शेकडा ऐंशी प्रमाणांत आढळतात. इंग्रजीचा चढता वाढता जोर व संपर्क असतांहि, शिष्ट मराठीचा कल शुद्ध संस्कृताकडे दिवसेंदिवस जास्तजास्त झुकत आहे. अशा प्रकारें ज्या भाषेचा आमच्या आचारव्यवहारांशी जिव्हाळ्याचा संबंध आज मितीस आढळून येतो, तिला 'मृत' हें विशेषण यथार्थतः लागू पडणारच नाही.

६ संस्कृताला 'मृत' समजणाऱ्या कांहीं आक्षेपकांची मजल याहीपलीकडे फार दूर पल्ल्यावर गेली आहे, व त्यांचें म्हणणें असें आहे की, या संस्कृताच्या मढ्याचें वजन मराठी भाषेला फार अवजड व असह्य झालें आहे; व मराठीला संस्कृताच्या पकडींतून सोडविणें हें त्यांच्या दृष्टीने लोकहिताचें, अवश्य व पवित्र कर्तव्यच होऊन बसलें आहे. मराठी भाषा उत्तम अवगत होण्याला व तिची कमावणी करण्याला संस्कृत भाषेच्या ज्ञानाची मुळीच जरूर नाही, असें या कंपूचें ठाम मत असल्यामुळे मराठी शिक्षक तयार करण्याच्या विद्यालयांतील अभ्यास-क्रमांतून संस्कृत भाषेची हकालपट्टी करण्यांत आली आहे! संस्कृताच्या संपर्काने मराठी भाषा बोजड व रांगडी होते, अशी या पक्षाची भावना आहे. परंतु मराठीचा आजपर्यंतचा इतिहास व नूर पाहिल्यास हें मत खोडकर आहे, हें सहज कळण्यासारखें आहे. कोणतीहि चांगली गोष्ट अगर चांगला गुण अतिरेकाला गेला, म्हणजे तो उद्वेगजनक होतो, ही गोष्ट आम्हांस मान्य आहे. साखर हा गोड पदार्थ आहे, आणि हाताचा सढळपणा हा सद्गुण आहे. परंतु दुधांत साखर बेसुमार झाल्यास तिचा वीट येतो, व बेताल औदार्याला मोळसट उधळपट्टीचें स्वरूप येतें. तथापि या कारणास्तव दुधांत मुळीच साखर घालूं नये, अगर कोणींहि कपर्दि-केचेंहि दान देऊं नये, असें म्हणणें शहाणपणाचें होईल काय? हीच स्थिति मराठी व संस्कृत यांच्या मिश्रणाची आहे. संस्कृताचा मसाला अपरंपार चेपल्यामुळे मराठीचें स्वरूप बेढब झाल्याचीं उदाहरणें मोरोपंतांचीं काव्यें, पावगींचा विलायतचा प्रवास, भिड्यांचा राघवीय परीवाह, इत्यादि ग्रंथांतून शोधून काढितां येतात; पण त्यावरून मराठी व संस्कृत यांची ताटातूट केली पाहिजे, असें कसें म्हणतां येईल, हें आम्हांस समजत नाही. मराठीचें पीक परंपरेनें अस्सल संस्कृत बीजांतून उगवलें आहे, हें पुढे दाखविण्यांत येईलच. परंतु ज्ञानदेवा-पासून मोरोपंतांपर्यंत होऊन गेलेले भाषापंडित आणि ज्यांची वाङ्मयात्मक संस्कृति बेताचीच होती असे नामदेवतुकारामांपासून महिपतीपर्यंतचे लोकप्रिय कवि, यांच्या ग्रंथांची चाळणा केली असतां, मराठीची वाढ संस्कृताच्या साह्यानेच झाली आहे, हें सूर्यप्रकाशाप्रमाणे स्पष्ट होतें. अर्वाचीन कालांतील गद्य व पद्य वाङ्मय पाहिलें असतां हीच बाब ठळक आढळते,

शिवाय संस्कृताचा आमच्या सामान्य व्यवहाराशीं किती संबंध आहे हें वरच्या कलमांत दर्शविण्यांत आलेंच आहे. तेव्हा आमच्या आजकालच्या शिक्षकांस व शिक्षितांस संस्कृत भाषेचें व वाङ्मयाचें बेताचें पण पायाशुद्ध ज्ञान अत्यन्त अवश्य आहे, असें आम्हांस वाटतें. आजकाल हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांतील शिष्ट जनांमध्ये विचारविनिमय करण्याला इंग्रजी भाषा हें एक मुख्य साधन झालें आहे. पण हें बहुमानाचें पद इंग्रजीला केवळ राजकीय परिस्थितीने व हल्लीच्या शिक्षणपद्धतीने मिळालें आहे. वास्तविक हें स्थान पूर्वी संस्कृत भाषेला होतें व तो तिचा जन्मसिद्ध हक्क होता; आणि किंचित् परिस्थिति बदलल्यास तो तिला पुन्हा मिळण्यास कठीण जाईल असेंहि नाही. संस्कृतभाषा आजकाल केवळ स्तब्धावस्थेंत आहे व हिंदुस्थानांतील देशी भाषांच्या कुटुंबांत तिची पदवी एकाद्या वृद्ध आजोबाप्रमाणेच आहे. आजोबांनी व्यवहारसंन्यास केलेला असतो. परंतु नवीन पिढ्यांस आजोबांचेंच पूर्वचरित्र व्यवहारचातुर्य शिकवितें, व स्फूर्ति देतें; आणि अडीअडचणीच्या वेळीं त्यांचेच शब्द मार्गदर्शक होतात. त्या मुनिव्रतस्थ आजोबांविषयी सर्वांसच आपलेपणा वाटत असतो, त्यांचा आसरा व आधार घेण्यास सर्वांसच सारखा हक्क असतो, व एकंदर कुटुंबांतील लहानमोठ्या व्यक्तींवर त्यांच्या विचाराची, धोरणाची व परंपरेची छाप कायम राहते. स्तब्धावस्थेस पावलेल्या या मूळ भाषेची छाप सर्व हिंदी समाजांवर अशीच टिकली आहे, व निरनिराळ्या प्रांतांतील सुशिक्षितांचा परस्परव्यवहार या भाषेंत होण्याला फारशी अडचण खास पडणार नाही.

७. कोणत्याहि राष्ट्रांत जी भाषा बोलतात, ती त्या राष्ट्राची भाषा, हें उघड आहे. परंतु कोणतीहि जागती ह्यात भाषा घेतली, तरी ती ज्या प्रदेशांत बोलली जात असते, त्या प्रदेशाच्या सर्व भागांत, अगर एकाच भागांतील सर्व व्यक्तींकडून, तंतोतंत सारखीच बोलली जाते, असें मुळींच नाही. भाषेची इमारत मुख्यतः शब्दांच्या उच्चारावर, प्रयोगसंप्रदायावर, व रचनाविशेषावर थाटलेली असते; परंतु या तीन्ही गोष्टी त्या भाषेच्या कक्षेंतील निरनिराळ्या प्रांतांत व एकाच प्रांतांतील निरनिराळ्या समाजवर्गांत, थोड्याबहुत प्रमाणाने भिन्नभिन्न आढळतात, व त्यामुळे एकाच भाषेची एकाच वेळीं भिन्नभिन्न रूपें व्यवहारांत वावरत असतात. कोणत्याहि दोन व्यक्तींचे चेहरे अगर स्वभाव जसे तंतोतंत सारखे असूं शकत नाहीत, तद्वतच त्यांचे शब्दोच्चार व भाषासरणी ह्यांतहि तंतोतंत मेळ असत नाही. परंतु एकाच प्रांतांत, एकाच संस्कृतींत, व एकाच परिस्थितींत वाढलेल्या इतक्या माणसांच्या या वैयक्तिक लकबा अगर खुब्या इतक्या क्षुल्लक, सूक्ष्म, व गूढ स्वरूपाच्या असतात की त्यांचा विचार न करितां, त्या व्यक्तींच्या बोलींतील ठोकळ साम्यावर लक्ष्य रोखून, त्या व्यक्ति एकच भाषा बोलतात, असें आपण म्हणतों; म्हणजे असे वैयक्तिक अल्पस्वल्प फरक भाषाभेद उत्पन्न करण्यास असमर्थ व अपुरे ठरतात. शिवाय, भाषा हें परस्परव्यवहाराचें मुख्य साधन असल्यामुळे, या बारीक सारीक भेदास आळाहि पडत असतो. परंतु एकाच व्यवसायाच्या, संस्कृतीच्या, व आचार राहणीच्या जनसमूहांतील व्यक्तींचा परस्परव्यवहार जितका हरघडीचा, निकट, व जिव्हाळ्याचा असतो, तितका भिन्नव्यवसायांच्या व भिन्न चालीरीतींच्या जनसमूहांतील व्यक्तींचा असूं शकत नाही. या कारणास्तव भिन्नभिन्न समाजवर्गांत साहजिक लहानमोठे भाषाभेद संभवतात,

यांपैकी अत्यंत लहान अगर कनिष्ठ जमातींचें वाग्वैशिष्ट्य क्षुद्र व क्षुल्लक गणलें जातें व तें स्वतंत्र पोटभाषेच्याहि प्रौढ पदवीस लायक ठरत नाही. परंतु हे क्षुद्र व क्षुल्लक भाषाप्रचार कालगतीने घडून येणाऱ्या सामाजिक, राजकीय, किंवा धार्मिक घडामोडींनें पोटभाषेच्या योग्यतेस चढणें शक्य होतें; एवढेंच नव्हे, तर कधी कधी दैवानुकूल्याने राजाश्रय व कल्पक ग्रंथकार यांची जोड त्यांस लाभल्यास, ते मुख्य राष्ट्रभाषेच्या सिंहासनावर विराजमान होणेंहि असंभवनीय नसतें.

या ऊहापोहाचा इत्यर्थ हा की, एका विवक्षित प्रदेशांत विशिक्षित काळीं अमुक एक भाषा चालू आहे, असें जरी आपण बोलतों, तरी ती भाषा त्या प्रदेशाच्या निरनिराळ्या विभागांत व समाजवर्गांत थोड्याफार फरकाने रूपभेद धारण करून लौकिकांत वावरत असते. त्या मुख्य भाषेच्या या प्रचलित रूपभेदांना 'विभाषा', 'पोटभाषा', 'प्रांतिक बोली' 'अपभ्रंश' इत्यादि संज्ञा दिलेल्या आढळतात. मेघद्वारें एकाच रूपाचें शुद्ध पाणी डोंगरावर पडतें. मग तें उतारास लागून अनेक प्रवाहरूपांनी निरनिराळ्या टापूंतून वाहूं लागलें, म्हणजे त्या त्या टापूंतील मातीचे गुणदोष, तीरस्थ वनस्पतींचे स्वभावधर्म, थडीप्रान्तांतील प्राण्यांचे आहारविहार, मनुष्यांची वस्ती, व्यवहार, व आचार, इत्यादि असंख्य आगंतुक संबंधांनी त्या त्या प्रवाहाच्या पाण्यांतहि नाना गुणभेद उत्पन्न होतात. असाच प्रकार निरनिराळ्या प्रान्तांतून व समाजवर्गांतून हरहमेश वाहणाऱ्या वाग्गंगेचा होतो.

८ आता वरील विवेचनावरून असा प्रश्न साहजिक उद्भवतो की, देशाच्या निरनिराळ्या विभागांत नांदत असणारीं भाषेचीं रूपें जर दुय्यम म्हणावयाचीं, तर त्या देशाच्या भाषेचें मुख्य स्वरूप कोणतें मानावयाचें व तें आढळतें तरी कोठें ? याचें उत्तर असें आहे की, प्रत्येक भाषेच्या प्रदेशांत एक सुशिक्षित उच्च वर्ग असतो त्यास 'नागर' किंवा 'शिष्ट' म्हणतात. त्याची भाषा नमुनेदार असून, तीच त्या भाषेच्या व्याकरणास आधार होते व तिच्यावरच ग्रंथभाषा उच्चारण्यांत येते. "ज्या ठिकाणचे शेतकरी व इतर सामान्य लोक जी भाषा बोलतात, त्या ठिकाणची ती भाषा आहे, असें साधारण रीत्या समजलें जातें"[1]. हा नियम जरी खरा आहे, तरी शेतकरी व सामान्य लोक हे त्या भाषेचें जें रूप प्रयोजितात, तें प्रायः शिष्ट व प्रतिष्ठित असूंच शकत नाही. या लोकांमध्ये भाषास्वरूप विकृत आढळतें, व शिष्टोपदिष्ट ग्रंथभाषेचा तो अपभ्रंश मानावा लागतो. असे अनेक अपभ्रंश प्रत्येक भाषेच्या प्रदेशांत प्रान्तोप्रान्तीं व निरनिराळ्या समाजवर्गांत एकाच काळीं व्यवहारांत असतात.[2] त्यांचें शिष्ट भाषेशीं बऱ्याच बाबतींत जसें साम्य असतें, तसेंच बऱ्याच बाबतींत वैषम्यहि दृष्टोत्पत्तीस येतें. म्हणून केवळ बोलीच्या सरणीवरून पुष्कळ वेळां बोलणारा कोणत्या प्रान्तांतील अगर समाजवर्गांतील आहे, हें आपणांस अचूक ओळखितां येतें. परंतु या अपभ्रंशांना स्वतंत्र भाषा समजण्यापुरतें सर्वमान्यत्व व अभिजातत्व आलेलें नसतें. त्यांचें स्वरूपहि बरेंच स्वैर, अस्थिर, व शिथिल असतें.

---

१ रा॰ ब. चिं. वि. वैद्य यांचे 'निबंध व भाषणें' पृ. १३.

२ Dr. Sir R. G. Bhandarkar's 'Wilson Philological Lectures,' pp. 280,296.

अशा प्रकारच्या प्रान्तिक किंवा वर्गविशिष्ट अपभ्रंशांना वराब आळा घालण्याचें मुख्य साधन सार्वजनिक शिक्षणसंस्था व समाजाच्या तळघडीस पोंचणारें सक्तीचें प्राथमिक वाङ्मय-शिक्षण, हें होय. अनागरांना शब्दोच्चाराचें व भाषाप्रयोगाचें शिस्तवार शिक्षण मिळून, त्यांच्या जिभेला शुद्ध संस्कार घडला व त्यांचा ग्रंथभाषेशीं परिचय झाला म्हणजे, प्रचलित अपभ्रंशांना झिडकारून शिष्ट भाषेचें अनुकरण करण्याची त्यांच्यांत प्रबल प्रवृत्ति उत्पन्न होते, व अपभ्रंशाची नांगी मोडून भाषाविकृतीचा वेग मंदावतो. परंतु यावरून असें समजावयाचें नाही की, सार्वजनिक सक्तीच्या शिक्षणानें भाषेला सर्वतः अचलत्व व एकरूपत्व येईल. जिवंत राष्ट्राच्या दैनंदिन व्यवहारांत जी भाषा गुंतते, तिच्या स्वरूपांत मानवी स्वभावाच्या कित्येक नैसर्गिक धर्मांनी व परिस्थितीच्या चलप्रकृतीने निरंतर लहानमोठे फरक घडल्यावांचून राहात नाहीत. अशा तऱ्हेच्या फेरबदलांच्या तडाख्यांतून कोणतीहि शिष्ट भाषा केव्हाहि सुटत नसते. याच कारणास्तव एकाद्या राष्ट्रभाषेच्या निरनिराळ्या काळांतील शिष्ट रूपांची तुलना केली असतां, त्यांत रचना, प्रयोग, शब्दांचीं रूपें, व लेखनपद्धति, या बाबतींत पुष्कळ ठळक भेद आढळून येतात. बेराव्या शतकांतील ज्ञानेश्वरीची मराठी भाषा व आजकालची ग्रंथप्रयुक्त मराठी भाषा, किंवा चॉसर्‌ची इंग्रजी भाषा व सद्यःकालीन ग्रंथांतील इंग्रजी भाषा, यांची तुलना केल्यास वरील मुद्दा कोणाचेहि सहज लक्ष्यांत येईल.

९ भाषेचीं अशिष्ट रूपें अगर अपभ्रंश ग्रंथांत येत नाहीत, हें वर नमूद केलेंच आहे. परंतु प्रसंगविशेषीं कांही हेतूने त्यांचे नमुने ग्रंथांत समाविष्ट करण्यांत येतात. लहान मुलांच्या कंठनाड्यांची व जिभेची कमावणी व्हावयाची असते. त्यांची स्मरणशक्ति, अनुकरणसामर्थ्य, व व्यवहाराची समजूत हींहि कोतींच असतात. त्यामुळे त्यांची बोली बोबडी, असमंजस व अशुद्ध असते. पण एकाद्या कथाप्रसंगांत लहान मुलांचें बोलणें घालण्याचा योग आला असता, ग्रंथकार बोबडी बालबोली योजून स्वभावोक्ति साधतात. उदाहरणार्थः—

गोपशिशु म्हणति, "[1]पलिसा, ललतां हलिनेंचि झालिला पाय,
गाला उलोनि पलला, सत्व खलें, नवल फलितसां काय?
(मोरोपंत— कृष्णविजय)
[2]माला, आइ, उथीव लौकल वलें, अंगास मी लावीन
दादाच्या, म्हनुनी गले, उथव तूं हांका मला मालुन,
(केशवसुत— दिवाळी)
[2]मालुं नको, ग, मी केलं काय तली, ग? (यशवन्त)

विशेषेंकरून कादंबरी व नाटकें यांत संसाराचें हुबेहुब चित्र वठविण्यासाठी निरनिराळ्या पात्रांच्या तोंडीं त्या त्या पात्रास स्वभावतः साजेल अशा स्वरूपाची अशिष्ट भाषा वारंवार घातली जाते. या क्लृप्तीने प्रतिबिंब यथास्थित उतरून, विनोद व हास्यरस हेहि पदरीं पडतात. ब्राह्मण विदूषकाने कोंकणस्थांची म्हणून नांवाजलेली अनुनासिकप्रचुर व प्लुतस्वरयुक्त भाषा बोलणे,

१ येथे 'र' व 'ड' यांऐवजी 'ल' योजून बोबडेपणा साधला आहे.
२ येथे 'ठ' बद्दल 'थ' व 'र-ड' बद्दल 'ल' योजण्यांत बोबडेपणा आहे.

# पेशवेकालीन मराठी भाषा*

(लेखकः--कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी)

भाषेच्या एकंदर जीवनावर राजवटींचा किंवा त्या त्या कालाच्या राजकारणाचा बराच परिणाम होतो. राज्यक्रांतीबरोबर धर्मक्रान्ति किंवा समाजक्रान्ति झाल्याचीं उदाहरणें प्राचीन इतिहासांत सापडतात. कोणत्या क्रान्तीमुळे कोणती क्रान्ति होते, कोण कोणाला कारण होतें ह्यासंबंधी मतभेद राहील. परंतु राज्यक्रान्ति, धर्मक्रान्ति, समाजक्रान्ति, विचारक्रान्ति इत्यादि क्रान्त्या ह्या साधारणपणें समसामयिक अशा असतात हें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. राज्यक्रान्तिहि भाषेला बरीच जाणवते. मोठमोठे कवि व लेखक हे विचारामध्ये क्रान्ति घडवून आणतात व त्यामुळे भाषाक्रांति होत असली पाहिजे, अशीहि विचारसरणी कांहींकांची असणें शक्य आहे. परंतु कवि, लेखक वगैरेंच्या वाङ्मयानें लोकांच्या बोलींत-रोजच्या व्यवहाराच्या भाषेंत-क्रांति किंवा पालट होते हें तत्त्व आम्हांस मान्य नाही. त्या वाङ्मयानें विचारपरिवर्तन होत असेल. भाषापरिवर्तन त्यानें होत नाहीं. भाषापरिवर्तन होण्यास राज्यपरिवर्तनच व्हावें लागतें असें आम्हास वाटतें; व ह्या मतास अनुसरूनच मराठी भाषेच्या उद्गमापासून तो तिच्या वर्तमानकालीन स्थितीपर्यंत जे कालखंड पडतात त्यांना नांवें त्या त्या काळच्या मुख्य कवींवरून न देतां त्या त्या काळच्या राजवटीवरून दिलीं आहेत. मराठीचा उत्पत्तिकाल किंवा ग्रंथनिविष्टकाल जर शकोत्तर १००० धरला तर त्या सुमारास यादवांची राजवट होती. ह्याच कालांत पुष्कळ मानभावी साधु व ज्ञानेश्वर, मुकुंदराज होऊन गेले. पुढे बहामनी राज्य सुरू झालें. ह्या कालांत एकनाथ, दासोपंत वगैरे साधुसंत झाले. पुढे शिवशाही सुरू झाली. ह्या काळांतील विचारपरिवर्तक कवि रामदास-तुकारामादि झाले. त्यानंतर पेशव्याची अमदानी आली तेव्हा मोरोपंत, वामनपंडित, श्रीधर, मुक्तेश्वर हे कवि झाले. पेशव्यानंतर आंग्लाई सुरू झाली व ह्या काळांत नावाजण्यासारखा कवि जरी कोणी झाला नाही तरी चिपळोणकर, आगरकर, टिळक ह्यांनी आपल्या लेखणीची चमक दाखविली. मराठी भाषेचे असे जे पांच कालखंड पडतात ते १ यादवकालीन, २ बहामनीकालीन, ३ शिवकालीन, ४ पेशवेकालीन, ५ आङ्ग्लकालीन—हे होत. ह्यापैकी येथे फक्त पेशवेकालीन भाषेचा विचार करण्याचें योजिलें आहे.

ह्या कालखंडामध्ये आम्हीं साधारणपणें १७००-१८५० पर्यंतचा १५० वर्षांचा काल धरिला आहे. प्रत्यक्ष पेशव्यांच्या उदयास्ताच्या काळाबरोबर जरी हा

* हा निबंध भा. इ. सं. मं. च्या १९ व्या संमेलनप्रसंगीं वाचण्यांत आला.

कालखंड तंतोतंत बसला नाही तरी भाषेचा विचार करितांना ही १५० वर्षांची स्थूल मर्यादा कांही वावगी नाही. शिवशाहीचा व त्याबरोबरच स्वराज्यस्थापनेचा उत्साहव-आनंद ओसरून मराठ्यांच्या हाडींमांसीं शंभु छत्रपतीच्या अमानुष वधामुळे व शाहू-च्या कैदेमुळे एक प्रकारची सुडाची भावना सळसळत होती. व त्याच भावनेने राजा-रामाच्या कारकीर्दीत व पुढे कांही दिवस राज्यशकट चालला. परंतु शाहूच्या सुट-केने सर्व परिस्थिति एकदम बदलून एकीच्या भावनेने संघटित झालेल्या मराठशाहींत दुहीचें बी पेरलें गेलें. राजयंत्र चालविण्याची शिवकालीन कल्पना आणि शाहुका-लीन कल्पना ह्यांमध्ये फार अंतर होतें. स्वार्जित स्वराज्याबद्दल जो एक जागता अभिमान होता तो शाहुकालीं राहिला नाही. दिल्लीपतीच्या मेहेरबानीने आपण मुक्त झालों व त्याच्याच मेहेरबानीने आपण तख्तनशीन झालों आहों, तेव्हा त्याच्या कृपा-कटाक्षाप्रमाणे मराठ्यांचें राज्यतंत्र फिरलें पाहिजे अशी शाहूची कल्पना होती. शिव-शाहीमध्ये लावलेलें स्वराज्याचें रोपडें पुढे शाहुशाहीमध्ये जरी पेशव्यांच्या करामतीने जोरांत फोफावलें व अश्वत्थाच्या वृक्षाप्रमाणे वर, खाली, चहूंबाजूंस सर्वव्यापी म्हणून त्याची परिणति झाली तरी शाहूच्या वर दिलेल्या कल्पनेच्या पिशाचाने शाहूलाच पछा-डलें एवढेंच नव्हे तर सर्व हिंदुस्थानास गवसणी घालण्यास निघालेल्या कर्तृत्ववान् व्यक्तींसहि त्याने पछाडण्यास कमी केलें नाही. दक्षिणच्या सहा सुभ्यांच्या चौथाई-सरदेशमुखीसंबंधीच्या सनदा बादशहापासून शंकराजी मल्हार व सय्यदबंधू ह्यांच्यामार्फत शाहूला आणवाव्या लागल्या. तेव्हा शाहूचें राज्य बादशाहतीच्या सावलींत वाढणारें राज्य अशीच त्याची कल्पना झाली. ज्या ज्या वेळीं बाजीराव, चिमाजी अप्पा आपल्या बारगिरांसह उत्तरेकडे चढाईस जात त्या वेळीं बादशाहतीस न दुखवण्याबद्दल तो त्यांना सक्त ताकीद देत असे. मुख्य केंद्रवर्ती राजसत्तेची परकीयांबद्दल भावना ही अशा प्रकारची होती. हीच परकीयांबद्दल आत्मीयत्वाची भुरळ त्यांना भाषेसंबंधी पडली. परिस्थितींतील हाच परानुवर्तित्वाचा ठसा शाहुकालीन किंवा पेशवेकालीन भाषेंत उमटल्यास नवल काय ! मूळ समजूतच तशी होती म्हणून पेशवाई जरी ब्राह्मणशाही झाली तरी तिच्या अमदानींत मराठी भाषेच्या बाबत किंवा मराठा धर्माच्या बाबत जितकी जाज्वल्य ज्योत शिवशंभु ह्या छत्रपतींच्या काळांत तेवली तशी शाहुकालीं तेवली नाही हें खास. फारशी भाषेची मगरमिठी जी बहामनी कालांत बसली ती शिवकालांत तशीच राहिली किंवा थोडीशी ढिलावली; परंतु पेशवाईत मात्र ती ज्यास्त जखडून आवळली गेली. व शिवशाहींत जे कांही भाषेसंबंधी थोडेसे प्रयत्न झाले ते निरर्थक झाले. बरें, पेशवेकालीन लेखक कोणी इतर जातीय होते असें नाही. सर्व लेखक चांगले ब्राह्मण, प्रभू, किंवा सारस्वत ह्यांपैकीच कलमबहाद्दर होते. प्रतिनिधि, सुमंत, सचिव, मुतालिक, चिमणाजी दामोदर, नारोराम, आनंदराव रघुनाथ, कृष्णराव जोशी, शंक-राजी केशव फडके, वासुदेव जोशी, पाटणकर दीक्षित, रेठरेकर, पुरंदरे घराणें, ढिंगणेबंधु, अंताजी माणकेश्वर, नारोशंकर, पटवर्धन मंडळी, लिमये, जिवाजी गणेश, पेठे, सखा-

राम बापु, नानाफडणीस, इ. इ. वगैरे सर्व चांगले प्रवुद्ध, सुसंस्कृत मंडळी होती. परंतु ह्यांना मराठी भाषेस फारशीच्या कचाटींतून सोडवितां आलें नाही. राजदरबार, घरव्यवहार, बाजारहाट, सैन्यमुकाबला वगैरे हरएक क्षेत्रांत फारशीमय मराठीच वापरली जात होती असें तत्कालीन पत्रव्यवहारावरून दिसतें.

मराठी व फारशी यांचा संबंध दृढावण्यास आणखीहि एक कारण झालें. शिवाजीच्या वेळीं फार मुलुखगिरी झाली नाही. संभाजीचा काळ दंगलींत व गोंधळांतच गेला. तोच गोंधळ राजारामाच्या कारकार्दीत चालला तरी लोकांनी थोड्याच वेळांत सावरून स्वराज्यवृक्षाची मशागत सुरू केली. परंतु मुलुखगिरीची परमावधि पेशवाईच्या प्रथमार्धातच झाली. बाजीरावाच्या घोड्याच्या पायांस तर भोवराच होता. दक्षिणेंतून उत्तरेंत, उत्तरेंतून कोकणांत, कोकणांतून निजामाकडे व निजामाकडून कर्णाटकांत अशी मर्दुमकी करून त्या सर्वांचा आढावा देण्यासाठीं पुन्हा सातार्‍यास शाहूछत्रपतींच्या चरणांशीं, अशा सारख्या येरजार्‍या त्याच्या चालल्या होत्या. "फौज फिरे आणि कर्ज फिटे" हा त्या कालचा राजमान्य शिरस्ता पडल्यामुळे जो तो त्या शिरस्त्याचाच अवलंब करी. बरें, मुलुखगिरींमध्ये हर्षामर्षाचे प्रसंग यावयाचे ते महमदीयांशीं किंवा अन्यभाषीयांशीं. तेव्हा अशा ह्या धुमश्चक्रींत कोण कोणाचे किती शब्द घेतो, कोणाच्या भाषेचा परिणाम आपल्या भाषेवर झाला, याजकडे लक्ष देण्यास कोणास फावत नव्हतें. परकीयांचें राजकीय जोकड मोडून फेकून देण्याकडे जेथे सर्व शक्ति वेचण्याची अहमहमिका चाले तेथे परकी शब्दाचें उच्चाटण करण्याकडे लक्ष नसल्यास आश्चर्य नाही; म्हणूनच आपणांस बहामनी कालांत मराठीच्या भोंवती जी एक फारशी भाषेची पोलादी चौकट घातली गेली त्याच चौकटींत पेशव्यांच्या ब्राह्मणशाहींतहि मराठी भाषा जखडलेली दिसते.

ही झाली मराठीच्या नांदत्या घरांतील गोष्ट. परंतु ह्या सारखीच परिस्थिति तिच्या माहेरघरीं—मराठवाड्यामध्ये—मराठी भाषेसंबंधीं होती. पेशवाईच्याच काळांत ह्या मराठवाड्यांत निजामउल्मुलुख ह्याच्या सारखा धोरणी, हुशार व मिठास असा अधिकारी दक्षिणचा सुभा म्हणून कारभारावर होता. बहामनी बादशाही किंवा त्याची झालेली उत्तरकालीन शकलें किंवा त्याच्यानंतर आलेली निजामत ह्या सर्वांची एक गोष्ट नावाजण्यासारखी होती, ती ही की ह्या सर्व राशीयती महमदी धर्माच्या होत्या तरी त्यांचा धर्माचा कडवेपणा इतका विकोपास न गेल्यामुळे इतर दृष्टीने स्थायिक लोकांत त्या समावून गेल्या होत्या. ह्या सत्तांबद्दल तेथील लोकांना परकीपणा वाटला नाही. उलट ह्या राशियती म्हणजे स्वराज्यच व आपल्या मर्दुमकीस, हुशारीस पूर्ण वाव देणार्‍या आहेत अशी त्यांची समजूत होती; व त्यामुळे अजाणताच त्यांच्या धर्मावर, भाषेवर महमदीयांच्या सान्निध्याचा परिणाम झाला. मराठीवरील फारशीचा परिणाम दृढावण्याचें हें आणखी एक कारण.

पेशवाईच्या उत्तरकालीं मोरोपंत, वामन पंडित, श्रीधरस्वामी ह्यांनी मराठीला

एक सुसंस्कृत असें वळण लावलें. ह्यांच्या भाषेला आपण पण्डिती भाषा म्हणूं. सामान्य भाषेहून किंवा राजदरबारच्या भाषेहून ही बरीच निराळी होती. ही भाषा सामान्य लोकांना न पेलल्यामुळे व त्यांच्या रोजच्या व्यवहारापासून ती फार दूर असल्यामुळे हिचें क्षेत्र पण्डितापुरतेंच मर्यादित राहिलें. तेव्हा सामान्य व्यावहारिक भाषेचा एक आणि ह्या पण्डितांच्या काव्यांतील ग्रांथिक भाषेचा दुसरा असे दोन नमुने पेशवाईतील भाषेचे दिसतात; पैकी दुसऱ्या नमुन्यांत अर्वाचीकरण झालें असल्यामुळे पेशवेकालीन भाषा अजमावण्यास तो नमुना उपयोगी पडणार नाही. त्याला त्या काळचा व्यावहारिक पत्रव्यवहारावरून मिळणारा नमुनाच पाहिला पाहिजे. पेशवेकालीन भाषेंमधील निरनिरनिराळ्या बाबींचा उलगडा पुढे केला आहे.

**वर्णप्रक्रिया—स्वर.** ( विकृत स्वर कंसांत दिला आहे.)

| आदि | मध्य | अन्त्य |
|---|---|---|
| अ—कृपा (ऋ), सवशय(ं) जैसे ( अ ) | ठराविला ( अ ), साडम्बर ( आ ), अपरमित, उदासन ( इ ) धृतानसार ( उ ) | मृत्य, हेत ( उ ) |
| आ—लाखोटे, शाह्य, माजोरी, ( मुजोरी ) माहाभारत ( अ ) | | |
| इ—द्रिस्टि ( ऋ ) क्षिणक्षिण ( अ ), सप्तरिसी ( ऋ ) | | |
| उ—द्रुस्टि ( ऋ ), कर्तुत्व ( ऋ ), विरुध्य ( उ ) | | |
| ए—येथास्थित (अ) येश, (य) संशये, येथाज्ञान, पारायेण ( अ ) | | वेस्तावेस्त ( अस्ताव्यस्त ) |
| ऐ—बैसला, ठैराव ( अ ) | | |
| ओ—दिसोन, भरोसा, दढोतर (दढतर) (ऊ) | | |
| औ—भ्रौंश ( ं ) | | |
| संयुक्त—औघा ( अवघा ), | आपल्याधीन | |
| वियुक्त—मुख अवलोकम, ईश्वरी इच्छा, आइकणें, सवशाय, उदिया | | |

**वर्णप्रक्रिया—व्यंजनें.**

| | आद्य | मध्य | अन्त्य |
|---|---|---|---|
| क | | पुरस्कर ( स ) | |
| ख | | पखवाजी ( क ) | नख्त (क) |
| ङ | | तङ्गचाई ( ण ) | |
| च | | राचकारण, पुण्याचवळ ( ज ), फडच्या ( श ) | |

शुद्ध तालव्य— चिच्यार, च्यार, प्रयोज्यन, भोज्यनास, राज्यास.

| | आद्य | मध्य | अन्त्य |
|---|---|---|---|
| छ | | वसोछर्ग, वसोछार्ग, संवछर (त्स) | |
| ज | जाली, जाहाली (झ) | त्याजप्रमाणे ( च ) | औरंगाबाज ( द ) |

| | | |
|---|---|---|
| ड | लडाई ( ढ ) | |
| ण | धण्याचे ( न ) | कुलीण (न) |
| द | सकलाद ( Sack-cloth ) | |
| न | वर्तनुक ( ण ) | सामदान (म), बातनी (म) |
| फ | शफत ( प ) | |
| व | हुबरीतुबरी ( म ) | |
| भ | | डाळिंबे ( ब ) |
| म—मंधु (ब), मांधून (ब), परमाणगी ( व ) | | |
| य | युध्य | |
| र | त्याजकारून ( ड ) | |
| ल | बदलामी ( न ), गलबल (ड) | |
| व—वलख ( ओ ) | वोक | |
| श—शीमा, शेनापती, स्वत (स) सांडस्वार, वर्शं, हर्शमार्ष, औशध. | | |
| ष—षोध ( श ) | | |
| स—सिव्या (श) | रसानगी ( व ) | गोस्ट ( ष ) |
| ह | काहाडणें ( ढ ), ठहरतील | |
| ळ = त्ल | सुरत्लीत, कत्लावे | |

वर्णागमः—काहाडणें, ठहरणें ( ह ) विज्यापुर, विच्यार ( य ).

वर्णलोपः—सकलाद ( सॅकक्लॉथ ), निर्गल ( निर्अर्गल ), स्नियासहस्नायु ( एका 'सह'चा लोप ),

राजकी वर्तमान ( यलोप ), प्रकर्ण, प्रजन्य ( पर्जन्य ).

' य ' हा नेहमी ' ये ' म्हणून उच्चारिला जात असे.

तृण—त्रृण, तृण, त्रुण, त्रण
श्रुत—श्रुत्य, श्रुत, श्रृत } इतक्या प्रकाराने लिहीत असत.

वर्णसंभ्रमः—ज्या वर्णांबद्दल संभ्रम होई असे वर्ण त्याच्या उदाहरणांसह खाली दिले आहेत.

अपसूक—अपसूत, अपसूप; निपचीत—निपचीप, उघडीप—उबडीक, पुरस्सर—पुरस्कर, जपणे—जतणे, पर्यायेकडून—पर्यायेकरून, मुखेकडून—मुखेकरून, अदमासे—अजमासे, निजसुरे—निदसुरे, नित्सुरे; यथास्थित—यथास्छित, गुजरणे—गुदरणे, नुकसान—लुकसान, तसबीर—तजवीर, तसवीस—तजवीस, नजर—नदर, खाजगी—खासगी, खानगी; मिनेदार—मिनेगार, वाजषी—वाजबी, मेजवानी—मेजमानी, पंचेताळीस—पंचेचाळीस, सदतीस—सडतीस, सततीस; तरबेद—तरबेज, जहांबाज—जहांबाद, अमदाबाद—अमदाबाज, किमखाप—किनखाप, ताबडतोब—साबडतोड.

वरील उदाहरणांवरून असें दिसेल की पेशवाई भाषेंत खालील वर्णासंबंधी संभ्रम होत असे.

स् >< त्, ज् >< द्, न् >< ल्, च् >< त्, प् >< त्.

वर दिलेल्या स्वरप्रक्रियेच्या उदाहरणांवरून ज्या गोष्टी प्रामुख्याने नजरेस येतात त्या ह्याः–

१ बहामनीकालीन व शिवकालीन मराठीभाषेंत उच्चाराच्या बाबतींत आर्यवंशाची मराठी आणि मोगल अथवा तुराणी वंशाची फारशी ह्या दोन भाषांमध्ये जो झगडा सुरू झाला तोच पुढे पेशवेकालांतहि चालला. एकीकडे मातृभाषेंतील जन्मापासून किंवा आनुवंशिक प्राप्त झालेले उच्चार आणि दुसरीकडे राजदरबारांत व इतर व्यवहारांत क्षणोक्षणीं कानावर आघात करणारे राजपुरुष आणि त्यांचें अनुकरण करणारे इतर पांढरपेशे उपजीवी नोकर यांचे उच्चार ह्या दोहोंमध्ये तो झगडा चाले. फारशीचा परिणाम कंठ्य, दन्त्य–तालव्य वर्ण, महाप्राणमिश्रित वर्ण इत्यादि वर्णांच्या बाबतींत जास्त दृग्गोचर होतो.

२ शब्द व्यंजनान्त न उच्चारितां स्वरान्त उच्चारण्याची जी लकब मराठी भाषेने प्राकृत व अपभ्रंश भाषांपासून उचलली तीच मराठीने फारशी भाषेवर लादली. उदा. गुजरान्, निशान् वगैरे फारशीमधील जे व्यंजनान्त शब्द मराठींत आले ते सर्व स्वरान्त झाले.

३ ह्याच प्रवृत्तीने शब्दांत अंगभूत असलेलें आंतर व्यंजन सुद्धा स्वरान्त झालें. उदा. सर्कार > सरकार, अप्कारी > अपकारी, जर्तार > जरतार.

४ ह्याच्या उलट फारशी भाषेची एक लकब शब्दामधील 'अ' निभृत म्हणजे अस्पष्ट किंवा अर्धा, तोकडा उच्चारण्याची मराठींत आली. उदा. गव्‌त्, नव्‌ल् इ..

५ ए, ऐ, ओ, औ हे उच्चार जेव्हा शब्दाच्या आरंभीं येतात तेव्हा त्यांचा उच्चार ये, यै, वो, वौ असे केले जातात. ही लकब सर्व द्राविडी भाषांमध्ये आहे. तीच पेशवेकालीन मराठीने कानडीच्या संसर्गाने उचलली असावी.

ऐसीजे > यैसीजे, ऐवजी > यैवजी, यथा > येथान्याय,
एक > येक, ओक > वोक, औषध > वौषध, वोषध.

६ मूर्धन्य, तालव्य, व ऊष्मवर्ण ह्यांच्या उच्चाराच्या बाबतींतहि द्राविडी भाषांचा संसर्ग दिसून येतो.

| **नामविभक्ति.** | | सर्वनामें |
|---|---|---|
| लिंग | हला, सला हे शब्द स्त्रीलिंगी वापरीत असत. तफावत ( पुल्लिंग ) | जे, हे, ते ( स्त्रीलिंग ) |
| प्र. | गोष्टी, खाम, अनीत, यादी (अनेकवचन) हेत, मृत्य, प्रकृत | कोण्ही, कोन्ही |

| | | |
|---|---|---|
| द्वि. (प्रत्यय स,सी.) | पुणियास, नवाबासी, डेरियासी, साहेबा, मरतीया ( कलावे ) | |
| तृ. (प्रत्यय एँ,हीं.) | जबानी (सांगता), नवाबाहीं, जातीनशी–सी प्रकारें, घाटें, चोरटीयांनीं, श्रीमंतांहीं, राजश्रीहीं | त्याणीं, याणीं, कोणे, कोणे प्रकारे |
| पं. (प्रत्यय हून.) | (तलेगांवीहून आला आहे) होऊन ह्या ल्यबन्तापासून 'हून' हा प्रत्यय आला आहे. | |
| ष. (प्र.चा,स,ला.) | मियाखानास निषेध ( चा ) | आपल्याले, कोण्हाचा, कुणाच्याने |

स.(प्रत्यय इँ,आँ) रायपुरीं, (आम्हीं) सातारा ( गेलों ), रात्रौ.

सामान्यरूप––हत्तीचीं लडाइमंधी, पुणियास, याचे सिंगी, हातची बंदखेचा गोळा. चांभारगोंदियास, पेशवियांचीं, शहरबाहेर, रतकियावर, उपाध्येयास, बोलवियाचा अर्थ, यादीवरी, कारखानेयात, पुणेयांत, असेलिया, मुराराव सोंडुरावर आहेची खबर आली. [वाक्यास विभक्तिप्रत्यय लागला आहे.]

विशेषणें––१ विशेष्याच्या पुढें विशेषण. उदा. खुळ मातबर, सरदार मातबर. २ विशेषणाचें सामान्यरूप झालें. उदा. कितीका दिवसात, दो चौ घटकास, कुली ठाणीं, वरचील. ३ नासमज माणूस फटकाल गोष्टी, बुर्डिवीं पेटारा, आम्ही पुर्वी केवढी होतो.

| क्रियाविभक्ति. | प्र. पु. | द्वि. पु. | तृ. पु. |
|---|---|---|---|
| वर्तमान | ( आपणच ) आहेत ( आम्ही, ऐकतोंत, ( आम्ही कारखांत ) येत नाहींत. | | बोलताती, म्हणताती, आहेती, असेति, म्हणताहेत. |
| भूत | मागो, जावो, करो (हीं रूपें आशीर्लिङ्गापासून आली कीं काय ?) | तुम्हीं आलेस् | बैसला, दिधल्या, बळावला, निर्गला, जाला, एकिले, बोलिले. |
| भविष्य | (आम्हीं) करून, जाऊन | | (स्थापना) होय (ऐशी केली पाहिजे) (विकल्प) आसल, (उपयोगी) पडे (ऐसा). |

आज्ञार्थ (लाऊन घाल तर न) लावणें. (रोजमरा द्यावा) लागतो. ( तूं ) येणें.
विध्यर्थ (बहुत काय) लिहिणें.

तुमन्त म्हणो ( लागले ), सांगू ( पाठवितो ), (शब्द) लागों (दिल्हा नाही)
ल्यबन्त० कृपाळून, पुसोन, फिरोन, जुपून
कर्मणि कृपा कीजे, लिहिजे, दीजे

णिच्

अकरणरूप—ठेवले न पाहिजे

कृदन्त लिहिलीं (आलीं), ठेवरे ( ठेवीं ), बोलाऊन करून.

जेवण्यासी, मिळताऊ, पोहणाऊ, होये न होये करावें, घराऊ.

**अव्ययें.**

क्रियाविशेषण अव्यय—परिच्छिन्न. अविलंबेच [करतो], उपरांतीक, रुपरांतीक, निश्चयरूप, वरचेवरी, मागती, बहोत, मधल्यामधी, आतल्याआत, शहरबाहेर, लवनि, मिष्य, देखतदेखत, महिनाभरा, जवळी, उपरा, वरी, जात्येसमई, यैवजी, उदियाआर्जी, सदंतर, कालीच, कालकाला, यदारंभी, गेल्यादारम्य, आल्यादारम्य, क्षणक्षण, तऱ्ही, जऱ्ही.

उभयान्वयी——म्हणौं, होयेस्तवर, म्हणवून, त्यास.

शब्दयोगी—— (विप्रामाणसा) वाचून, ( आज्ञापत्र ) समागमे मलोजी (पावलें), तुम्हा सांगाते.

### नामविभक्तिप्रत्ययावरून उघड दिसणाऱ्या बाबी.

१ यादवकालीन प्रथमेचा प्रत्यय ' उ ' हा शिवकालापर्यंत होता. पेशवाई मराठीमध्ये तो फारसा आढळून येत नाहीं.

२ सामन्यरूप चमत्कारीक तऱ्हेने होत असे. उदा:—— हत्तीची लढाईमध्ये.

३ विभक्तीचे प्रत्यय कधीकधी वाक्यास लावीत असत.

४ सामान्यरूप हें षष्ठी विभक्तीच्या प्रत्ययाच्या अवशेषापासून बनलें आहे असें मानतात. परंतु त्याहून भिन्न असें एक मत पेशवेकालीन भाषेच्या पुराव्यावर पुढे येणें शक्य आहे. सार्वनामिक प्रत्ययावरून तें बनलें असावें असें वाटतें. उदा० :— "पुणे यास, कारखाने यांत, उपाध्ये यास, बोलणें याचा, इतकियावर ह्या रूपांवरून पुण्यास, कारखान्यांत, उपाध्यास, बोलण्याचा, इतक्यावर, हीं रूपें बनलीं.

५ विशेषण आणि विशेष्य ह्याचा स्थानभेद:

### पेशवेकालीन मराठी शब्दविशेष

पेशवेकालीन मराठीमध्ये जे कांही मनावर ठसण्यासारखे व जोरदार असे शब्द आढळतात त्यापैकी कांही खाली देतों.

अक्षतमरिष्ट, इदंन्याये, उभामार्ग (जकात), उपरोधिक (कमीअधिक), अपरोक्ष, इतला, उचापत, उपरशब्दी, आंतरभाव, बाहेरभाव, उपरान्त, आमदरफ्त.

कुष्टपिष्ट, कटकट, कमकसर, गर्गशा, (फौजेचा) गाहा, धावडाव, कुचोध, करार (नक्की), खामखा खानखा, खायेमखा, किलाबा, कौल, कमरबंदी, छिटपीट, जंगजोड, झांबडाझांबड.

चौकी बसवणें, छबिना, जथणे.

टुमा, टक्कापैका, ठेचगा, ढालढकल, डौल, नक्षा.

ताबीज, त्वष्ट, तष्ट; दबाव, द्वामुषाण, धातुपोषण, निरवगूक, त्यादात्म्य, दुरंदेशी, दिलभरी, दुरोखी, निर्गमला, तिवट, दुखणारु, दावघात्र, दरद, निशा.

पोटाग, पोटतिडीग, पायगोवा, पायउतारा, फलादेश, भाईचारा, निवडिले, प्रतिपक्ष, पान्हव, पुरजे, फितवाफांदडा, भुकेत्रंग, मनोधारणा, पुस्तपन्हा, परिछिन्न, बेहवुर्दी, मखई, पासोडी, पैवस्ती, बालाग्र, बदनक्ष, मवासी, पुरसीस, बिराडराखे, बजिन्नस, मनस्वोळ, रूपरान्त, लागभाग, वारापाणी (होणें), रुबरू, उरुबरू; लगारे, वसवसा.

रासकर्दन, रफाकत.

शकटभेद, (प्रकर्तास) सावकाश, स्थलमोड, सविस्तरपूर्वक, शशोपंज, सकलाद, स्थलभरीत, सामानपूर.

हर्षामर्ष, हुबरीतुबरी, हालुखुद, हिल्लाहरक, हिसका, हरोली,

अर्थभेदः— वजीर, कारकून, हवाल्दार, जमादार, फडकाल, वाडा, देवढी, राणीवसा, खबरदार. ह्या शब्दांच्या अर्थांत फरक झाला आहे.

## पेशवेकालीन प्रयोगविशेष

राजकारणे करणें.
खुळ उभे करणे, माजणें.
गरिबाचा दुवा घेत असावे.
हिसका पडला, गुता उरकला.
तुमचे गोत्र घटित होलकरासी, नारोपंतासी नसते तर हे लिहिणें उचित.
ध्यानांत भरत नाहीं.
आमचे लोकांचे कैसें विकतें.
धुळीचे दिवे खात जाल.
चढ देणें, भर देणें.
होषा खादला. सिधांतसे ऐकतों.
आलस असिला न पाहिजे.
क्रिया देणें. क्रिया करणें.
क्रोधे येऊन ( नरम येऊन बोलले ).
बिढाहून पत्र आलें कीं अमल बंद केला म्हणून.
जे मुले आहेत ते राज्याकडे पाठऊन दिल्ही.

कारभाराविसी कान पाडिले आहेत.
कारभारास वाकीफ नाहीं जे तुम्हासी जाबसाल करावा.
कारकून म्हणतो जे (संस्कृतच्या 'यद्'च्या धर्तीवर वाक्यरचना)
निरोपाचीं वर्खे जाहालीं.
यांचें गंतव्य होत नाहीं.
डावाडोलसे असमाधान आहेत.
या झाडास येरंड्याचीं फळें आलीं.
सर्वा गोष्टीस भयाची प्रीत आहे.
लहान माणसाचे पंक्तीस बसावें लागतें हाच मूरय आहे.
रवानगी यैवजाची करावी. (दूरान्वय)
त्यास यैवज द्यावयासी नाहीं.
यैसे तीन पत्रें आलीं ते आह्मास बजिनस दाखविलीं.
सेवकाचें पत्र राज्यानी पहावयास मागत असतात.

घोडा स्वाधीन नसल्यास बसणारा काय करील.

हत्तीचें तोंडीं लाकूड देऊन कार्य बिघडलें.

होणेरास उपाय नाहीं.

जीवाचा सतका माल व इजतीचा सतका जीव.

येथें फ़िर्याद आले आहेत.

कोणाचे डोळ्यांत मर्यादा राहिली नाहीं.

माणुस माणसास खावयाचा काळ आला आहे.

आपआपल्यांतच पाय तुडविताहेत.

जितके फितुरांत होते त्यांचें शीड उभारलें.

आपण ज्या पाण्यांत बुडा म्हणिजेल त्या पाण्यांत बुडावयास सिध आहों.

पैजार खाऊन दंतभंग जाला.

शुस्क वृक्षास पलव फुटून पुस्पित फळित होतो तद्वत्.

ईश्वराक्ष यैवज देणें तो (अन्तस्थ ह्या अर्थी)

उष्णकालीं माशाहि फार होतील. उगाच बसावें हे मर्जी.

अवसान ओळखणें.

सहजाची आरती, सहजाचा गजर.

सुनें रान सांपडल्यावर स्वापदाची प्रबलता होते.

श्रीमंताचा आमचा श्नेह चिखलपाण्या सारखा आहे. चिखल पाण्यास सोडत नाहीं व पाणी चिखलास सोडीत नाहीं. त्या चिखलमातीनें आपण इमारत बांधूं.

चार आभाळें उठलीं असतील तीं उठतील.

श्रमी चाकर, दुष्मन बराबर.

दिवे लावणीचा कौल देऊन रयत आणिली पाहिजे.

चिखलाचे बाहुलीस जसा चिखल पाहिजे तितका लावावा व पाहिजे तितका काढावा तसा प्रकार हा नव्हे.

कळीचा वास जेथें तेथें श्रीचा अभाव.

मनुष्य मनुष्या खाऊं म्हणतो.

उदक स्वच्छ गोड हि त्यासारखे तेंच.

तो सल्यास येऊन थोडाबहूत खंडदंड करून येऊन भेटला.

प्रकृतीस सावकाश नाहीं.

जमावाचा डौल दाखवावा.

कल्पवृक्षाखालीं झोळीस गांठी द्याव्या हें अपूर्व.

सखारामपंत केवळ कोशकीटकाप्रमाणें कैद झाले.

चौघांनीं चारी तनवा धरल्यावर शिबीर उभें रहातें.

अंगावर आल्या गोणी, बळी चढे दुणी.

लढाईचा दंगा पुरवतो, उपासाचा दंगा पुरवत नाहीं.

गेल्याचें घर, मेल्याची बायको.

उदकापासून वृक्ष झाला त्याला उदक तारते, बुडवीत नाहीं.

विना माणसावाचून भिंती भांडत नाहींत.

टीच भरली; चमक भरली.

जियाल्याची खूण मेल्यावाचून जात नाहीं.

सश्याचे पारधीस वाघाचे पारधीचे साहित्य करावें लागतें.

जैसे मरतिया अमृतपान द्यावें, यैसें जालें.

ना अस्मान ना जमीन असा प्रकार जाला.

सूक्ष्मत्वलमतिपल्लवितेन.

आम्ही कच्चा धाग्याचे बांधलेले आहोंत.

विहिरींत उतरून शिडी काढून घेतली. बेरें, ईश्वरसत्ता.

ब्राह्मणाची व्यवस्था होय यैशी केली पाहिजे.

हत्तीची लढाईमंधी मरण झाडाचें.

स्वामीचे चरण सेवकाचे मस्तकीं आहेत.

( माझें डोकें आपल्या चरणावर आहे ह्याच्या उलट )
अंगुष्टाचा दशाशीर करून दाखवितात.
तथापि आपण कूर्मदृष्टींचे देखण्यांत कमी न करावी.
त्यांची बुधि अल्पायु आहे.
चिरंजीव व्यवहार कांहीं दिसत नाहीं.
आमच्या वाहीमध्यें आग ठेविली आहे.
दुर्ग जर दुर्गामध्यें राहिला तर कसे.
मिठाचे उणेंपणानें लवणशाकाचे वाईट होईल.
विसंचा संच करणें.
कोणाचें मडकें कोणाच्या मडक्यांत नाहीं.
असत्या पदार्थीं बापू थोर.
मुखश्री दिसत नाहीं.
असा हिसका पडेल हें कानींमनीं नव्हतें.
ऊब जिंकणें.
फौज फिरे कर्ज मरे.
सुटले केश पाठीस शरण.
ठक्का पैका.
बिगाड करील तर खिरत खातील.
मर्यादा परागंदा होते.
कोळसा उदकें उगाळितां सारें उदकच काळे, तेव्हां उदक व रंग निवडूं जातां कसें घडेल ?
अक्कलेच्या भरें क्षीर नीर वेगळें करणार येसा क्वचित.
एके बाईकोस दोन भ्रतार ते श्रेष्ठ चालतात हे कसे घडेल ?



अनुक्रमणिका

# अभिप्राय

**हिंदुसमाज समर्थ कसा होईल ? :—** ( ले. महादेवशास्त्री दिवेकर, मूल्य १ रुपाया. )

' हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमालेंतील हें पहिलें पुस्तक असून त्याची दुसरी आवृत्तिहि निघाली यावरून पुस्तकाची लोकप्रियता सिद्ध होते. लोकजागृति करणें हा उद्देश पुढे ठेवून दिवेकरशास्त्री आपलीं पुस्तकें लिहीत असतात. उद्देश सफल होईल अशा तऱ्हेचें प्रस्तुत पुस्तक वठलें आहे ह्यांत संशय नाही. सर्वांत अत्यंत क्लिष्ट प्रश्न म्हणजे हिंदु कोण हा होय. शास्त्रीबोवांनी श्री. सावरकर यांची व्याख्या मान्य केली आहे, परंतु ती सर्व विघ्नहरती आहे असें आम्हांस वाटत नाही. हिंदुस्थानाला जो आपली पितृभू व पुण्यभू समजतो तो हिंदु ह्या व्याख्येने सर्व अडचणींचा परिहार होत नाही. लिंगायत हे हिंदुस्थानाला पितृभू व पुण्यभू मानतात. हिंदुस्थान ही त्यांची पुण्यभूमि होय; तथापि शास्त्रीबोवांच्या हिंदूंत समाविष्ट होण्यास ते तयार नसल्यास पुढे काय करावयाचें ? पारशी हे संस्कृतीनेहि हिंदूंना जवळ आहेत. त्यांना हिंदु कां मानूं नये ? उद्या अफगाणिस्थान जिंकून हिंदुस्थानांत सामील केलें व आम्ही हिंदु त्या देशांत वसाहत करून राहूं लागलों तर आमचें हिंदुत्व जाणार काय ? बरें बिझांटबाई आपणांस हिंदु म्हणविते ती सावरकरांच्या व्याख्येने बाहेर पडेल त्याचें काय ?

तात्पर्य, हिंदु शब्दाची व्याप्ति ठरविणें दुःसाध्य कर्म आहे. जो आपणांस हिंदु म्हणवून घेईल तो हिंदु ह्यावरं अखेरीस येतें; पण तितक्यानेहि काम भागतें असें नाहीं; म्हणून हिंदुसमाज जोपर्यंत निश्चित करतां येत नाही तोपर्यंत त्या समाजाच्या उत्कर्षाचे उपाय धुंडाळणें फोल आहे. आमच्या मतें हिंदु कोण हें निश्चित करण्याकरितां एक मोठी परिषद भरवावी. ह्या अखिल भारतपरिषदेंत दुसरें कोणतेंहि काम करूं नये. पुस्तकें लिहिण्यापूर्वी शास्त्रीबोवांनी अशी परिषद भरवून हिंदूची व्याख्या स्पष्ट करून घ्यावी अशी आमची त्यांस सूचना आहे.

**कथासंग्रहः—**संग्राहक वा. त्रिं. भाटे, एम्. ए., व ना. रा. सखदेव बी. ए., बेळगांव, किं. १ रुपाया

ह्यांतील कथा अथवा गोष्टी सामान्य आहेत. मुलांना करमणुकींत ज्ञान प्राप्त करून देणाऱ्या अशाहि कांही गोष्टी आहेत. डॉ. साठे यांस लघुकथालेखनकला चांगली साधेल असें भाकीत करण्यास हरकत नाही. विद्यार्थ्यांकरिता म्हणून लिहिलेल्या कथांत लीलेची गोष्ट नसती तर बरें झालें असतें. 'भाव तसा देव' ही गोष्ट चांगली आहे. एकंदरींत मुलांना वाचण्यालायक पुस्तक आहे.

ना. गो. चापेकर.

